# आकसाचे बळी

श्री. आबा करमरकर हे ध्येयवादी व निष्ठावंत सामाजिक व राजकीय कार्यकर्ते म्हणून नामवंत आहेत. डेअरीच्या धंद्यात ते आज २५ वर्षे आहेत व त्या धंद्यातले मुरब्बी आहेत. आरे कॉलनीतील गवळ्यांची कैफियत त्यांना मांडाविशी वाटली एवढी एकच गोष्ट, या गवळ्यांचे गाऱ्हाणे रास्त आहे, असे मानावयास पुरेशी आहे. श्री. आबा करमरकरांसारख्या न्याय्यबुद्धीच्या व मुरब्बी माणसास आरे कॉलनीतील गवळ्यांनी बनविले आहे असे एरवी मानावे लागेल. असे मानणारा माणूस स्वतःचे हसे करून घेईल असे मला वाटते.

आरे कॉलनीतील गवळ्यांनी आपले सारे दूध सरकारलाच विकले पाहिजे आणि सरकार दुधाचा जो भाव ठरवून देईल त्यावर अपील नाही, या मूळ करारातील शर्तींचा सरकार गैरवापर करीत आहे याविषयी शंका रहात नाही. आरे कॉलनीची घडण लक्षात घेता, दूध सरकारलाच विकले पाहिजे ही अट त्या घडणीचा अंगभूत भाग म्हणून स्वीकारावी लागेल; या बाबतीत, गवळ्यांना दूध बाहेर विकावयास स्वातंत्र्य द्यावे हा करमरकरांचा मुद्दा योग्य नाही. पण दुधाची किंमत कशी ठरविली जावी, तीत कोणत्या बाबींचा समावेश असावा, दर बाबीवर धरलेला खर्च योग्य की अयोग्य ते कसे ठरवावे, आणि मतभेद झाल्यास दाद-फिर्याद मागण्याची रीत काय असावी या मुद्द्यांवरून सरकारच्या हाती सर्वाधिकार असणे गैर आहे. 'त्या शर्तीवर गवळी आले आहेत, आता तक्रार करण्यात अर्थ नाही' असा युक्तिवाद सरकार करू शकेल, करीत आहेच. पण ज्या मूलभूत तत्त्वांवर भारताची राज्यघटना बनविलेली आहे त्याच्याशी तो सर्वस्वी विसंगत आहे. (सरकारने नेहमीच अशी भूमिका घेतलेली नाही. १९६१ साली जी तज्ज्ञसमिती नेमली तीवर गवळ्यांचे प्रतिनिधी होते.)

'हम करेसो कायदा' या सरकारी वर्तनाचे काही नमूने करमरकरांनी दिले आहेत ते असे:

(१) ज्या म्हशींच्या दुधाची रोजची सरासरी ६.९ लिटरपेक्षा कमी असेल त्यांचे दूधउत्पादन विचारात घेतले जात नाही. पण खर्चाची सरासरी काढताना म्हशी मात्र सर्व धरल्या जातात. ज्या गवळ्यांच्या काही म्हशींचे दूध मानदंडापेक्षा कमी निघते त्यांना शिक्षा करावयाची असेल तर ते एकवेळ समजू शकेल. पण आज शिक्षा सर्वच गवळ्यांना होते!

(२) १४/११/६७ च्या पत्रान्वये सरकारने अमूक एक तयार खाद्य मिश्रण वापरावे असा आदेश काढून यापुढे त्या बाबीवरील खर्च त्या मिश्रणाच्या किंमतीनुसार धरला जाईल असे जाहीर केले. ते मिश्रण वापरल्यावर दूध उत्पादन मानदंडानुसार येते हे बघण्याची, दाखविण्याची जबाबदारी सरकारने घेतली नाही.

(३) १०० लिटर दूध उत्पादनाचा खर्च रु. १६५ च्या आसपास द्यावयास हवा होता (प्रस्थापित पद्धतीप्रमाणे) त्याऐवजी एकाएकी रु. १५० च्या भावाने हिशेब करण्यात येईल असे सरकारने कळविले. याच्या परिणामांची कदर सरकारने केली नाही.

'आमची कैफियत'* वाचल्यानंतर हे लक्षात येते की संबंधित सरकारी अधिकाऱ्यांची आरे कॉलनीतील गवळ्यांविषयी,

ते लबाड आहेत याची ठाम खात्री झालेली आहे; आणि काही करून दुधाची खरेदी किंमत कमी करावयाची हे त्यांचे लक्ष्य बनलेले आहे.

** 'आमची कैफियत', र. गो. करमरकर, आरे मिल्क प्रोड्युसर्स असोसिएशन, मुंबई, १९७१*

दुधाचे उत्पादन स्वस्त पडावे अशी इच्छा असणे स्तुत्य आहे, तसा प्रयत्नही सतत चालू ठेवला पाहिजे. पण हिशेबी हातचलाखीच्या मार्गाने खरेदी किंमत खाली आणणे, हा काही योग्य उपाय नव्हे. तो लोकांच्या धंद्याशी व जिवाशी खेळ आहे.

श्री. करमरकरांनी पृ. ७४ वर दिलेल्या माहितीनुसार आनंदचे (गुजरात) दूध रु. १.२३ पैसे लिटर पडते, तर ग्रामीण भागांतील दूध योजनांचे रु. १.४० पैसे लिटर पडते. सरकार दोन प्रकारची भूमिका घेऊ शकते. (१) हळूहळू आरे कॉलनी बंद करून ग्रामीण भागातूनच सर्व दूध गोळा करावयाचे. किवा (२) आरे कॉलनीच्या गवळ्यांचे दूधही स्वस्त पडले पाहिजे असा आग्रह धरावयाचा.

पहिली भूमिका घेणे आणखी १०/१५ वर्षे तरी शक्य नाही कारण ग्रामीण दूध योजनांकडून होणारा पुरवठा आज पुरेसा नाही, व तो तत्काळ वाढण्याजोगा नाही, ही वस्तुस्थिती श्री. करमरकरांनी स्पष्ट केली आहे. ग्रामीण भागातील दूध आजच्या व्यवस्थेत मुंबईस येऊन महागच पडते कारण सरकारने जागोजाग उभ्या केलेल्या यंत्रणांचा खर्च, वाहतूक खर्च, इत्यादी त्यात मिळवावा लागतो. आज तरी हा खर्च नाकापेक्षा मोती भारीच जड या प्रकारचा आहे.

या उपरही धोरण म्हणून सरकारचा असा निर्णय असला तर, सरकारने तो जाहीर करावा, व पुरेशा दीर्घ कालावधीची नोटीस देऊन गवळ्यांना आरे कॉलनीतील गाळे खाली करण्यास सांगावे. ते न्यायाला व रीतीला धरून होईल.

दुसरी भूमिका सरकारला घ्यायची असेल तर दुधाचे उत्पादन दर म्हशीमागे कायम ठेवूनही उत्पादन खर्च कोठे व कसा कमी करता येईल हे सरकारने गवळ्यांना पटेल अशा पद्धतीने दाखवून दिले पाहिजे. आरे कॉलनीतच सरकारला एक युनिट १०५ म्हशींचे कायम ठेवता येईल. पण तसे न करताही याच व्यवसायातील जाणकार मंडळींची एक स्थायी समिती नेमून ते करता येईल. उदाहरणार्थ, आनंदच्या परिसरात अशी मंडळी असणार, श्री. करमरकरांसारखी स्वतंत्रपणे व्यवसाय करणारी असणार (उरुळी कांचनच्या श्री. मणिभाई देसाईंचे नावही पुढे येते). त्यांचा सल्ला आरेच्या गवळ्यांना धुडकावून लावता येणार नाही.

पण आरे कॉलनीतले आजचे गवळी लबाड आहेत व त्यांना लौकरात लौकर हुसकले पाहिजे अशा निर्णयावरच जर संबंधित अधिकारी आले असले तर? (अनुभवाने) तशा निर्णयाला येण्याचा त्यांना अधिकार जरूर आहे. पण आरेचे गवळी आणि बाकीचा समाज दोघांच्याही दृष्टीने आरेच्या गवळ्यांची लबाडी निर्विवादपणे सिद्ध करण्याची जबाबदारी खात्याने घेणे आवश्यक आहे.

'आमची कैफियत' वाचून एकदोन गोष्टी खटकतात. एक, आरेच्या गवळ्यांविरुद्धची संबंधित अधिकाऱ्यांची कैफियत

काही असणारच. ही कैफियत, प्रतिपक्षाला जास्तीत जास्त न्याय देऊन, प्रथम देऊन, तिचे खंडन करण्याची गरज होती. दोन, दुधाची उत्पादन किंमत मुंबईत काय पडते याचे तौलनिक आकडे कोठेच नाहीत. खुद्द श्री. करमरकरांची डेअरी मोठी आहे. इतरही या व्यवसायातली काही मंडळी त्यांच्या परिचयाची असणार. सरकार विरुद्ध आरे गवळी या प्रकरणी, दूध स्वस्त पडायला हवे हे सरकारचे म्हणणे, मानणे योग्य समजा असले तरी, ते प्रत्यक्ष मूर्त करण्याची रीत चुकीची व गवळ्यांच्या पोटावर मारणारी आहे, हे श्री. करमरकरांनी पुराव्यानिशी दाखवून दिले आहे. पण, स्वतंत्रपणे, आरेच्या गवळ्यांच्या व्यवहाराविषयी त्यांनी व्यावसायिक मूल्यमापन दिलेले नाही. या दोन मुद्द्यांवर ‘आमची कैफियत’ शबल ठरते.

पुस्तकात बरीच पत्रे छापली आहेत. त्या विभागाच्या शेवटी श्री. करमरकर लिहितात, 'आम्ही हा जो पत्रव्यवहार प्रसिद्ध केला आहे त्यात सर्व आम्ही पाठविलेलीच पत्रे आहेत. उत्तरे का छापली नाहीत अशी रास्त शंका निर्माण होऊ शकेल. परंतु आमच्या पत्राला कोणाकडूनही एकही उत्तर आलेले नाही. तेव्हा ती छापणार कशी?' सत्तेवर असलेल्या अधिकाऱ्यांना व पुढाऱ्यांना साध्या सौजन्यालाही दाराबाहेर ठेवण्याचा अधिकार असतो?